**६ व्या अण्णाभाऊ साठे आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सव,**
**पुणे यांना सहायक अनुदान मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आंचिम-२०२३/प्र.क्र.८३/सां.का.१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, अभिलेख कक्ष क्र.२२, मुंबई ४०००३२.
दिनांक : ११ सप्टेंबर, २०२३

वाचा : १) शासन निर्णय,पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.आंचिम-२०११/प्र.क्र.१५८/ सां.का.१, दि.१८.१०.२०१२.
२) मुख्य प्रशासकीय अधिकारी तथा सहव्यवस्थापकीय संचालक (अ.का.) यांचे पत्र क्र.संकीर्ण-२०२३/ऐ.सा.शै.क्षे.नि.स.अ./ज.वि./१३/४५५, दि.२६.०७.२०२३.
३) दिग्दर्शक, अण्णाभाऊ भाऊ साठे आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सव पुरस्कार / सन्मान समिती व निर्मिती मिडीया सोल्युशन, पुणे यांचे दि.१८.०८.२०२३ चे पत्र.

प्रस्तावना :

शासनाच्या संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवास शासन सहाय्यक अनुदान मंजूर करते. त्यानुसार ज्या ३ संस्थांना अर्थसहाय्य दिले जाते. त्याव्यतिरिक्त "प्रथम येणाऱ्या प्रथम" या तत्वावर विहीत निकषांची पूर्तता करणाऱ्या, जास्तीत जास्त १० सस्थांना प्रत्येकी अधिकतम रु.५.०० लक्ष याप्रमाणे सहाय्यक अनुदान मंजूर करण्याबाबतच्या प्रचलित धोरणानुसार अण्णाभाऊ साठे आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवासाठी केलेल्या निधीच्या मागणीच्या अनुषंगाने सदर महोत्सवास सहायक अनुदान देण्याची बाब विचाराधीन होती.

शासन निर्णय :

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये शिफारस केल्याप्रमाणे अण्णाभाऊ भाऊ साठे आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सव पुरस्कार / सन्मान समिती व निर्मिती मिडीया सोल्युशन, पुणे या संस्थेद्वारे दि.०५ व ०६ ऑगस्ट, २०२३ या कालावधीत आयोजित करण्यात येणारा ६ वा अण्णा भाऊ साठे आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सव दि.०५ व ०६ ऑगस्ट, २०२३ रोजी काही तांत्रिक कारणास्तव पुढे ढकलण्यात आला आहे. आता संदर्भ क्र.३ अन्वये कळविल्यानुसार ६ वा अण्णाभाऊ साठे आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सव दि.०७ व ०८ ऑक्टोबर, २०२३ या कालावधीत आयोजित करण्यात येत आहे. राष्ट्रीय फिल्म अर्काइव्ह ऑफ इंडीया, पुणे येथे होणाऱ्या अण्णाभाऊ साठे आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवासाठी राज्य शासनातर्फे रु.५.०० लक्ष (अक्षरी रुपये पाच लक्ष फक्त) इतके अनावर्ती स्वरुपात सहायक अनुदान या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात येत आहे.

२. यासाठी, उप सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, अवर सचिव (रोख शाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई यांना सदर रक्कम एकरकमी वितरीत करावी.

३. चित्रपट महोत्सवाच्या समारोपानंतर किमान ३ महिन्यात उपयोगिता प्रमाणपत्र त्यांनी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई यांच्यामार्फत शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

४. यासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती (००)१०२,कला संस्कृती प्रचालन (०३) (०६) आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सव (२२०५१५८१), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल,२०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-१, अ.क्र.२७, नियम क्र.१४९ (२) नुसार प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार प्राप्त खर्च करण्याच्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. प्रस्तावित खर्चासंदर्भात वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/ प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०१ एप्रिल, २०१९ मधील परिच्छेद क्र.६ (अ)(ब), ७ (१अ) (३) तसेच परिशिष्टातील अ.क्र.८ मधील अट क्र.१,२,३,४,५,१० ची पूर्तता होत असून उर्वरीत सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटी या प्रकरणी लागू होत नाहीत.

६. सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०८२५११२०५९७७२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA HEMANT WAGHMARE

Digitally signed by VIDYA HEMANT WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=4e214bf8a250420c28c2084d8dd965c0d454568322bd41981d48971712e51795, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F93EFE7B946BF26FF989D6E5E01E1B122B9EB4E3E4E6799CB8E82B2D33D58DFC, cn=VIDYA HEMANT WAGHMARE
Date: 2023.09.11 18:20:54 +05'30'

**( विद्या वाघमारे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
३. महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई
४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
७. वित्त विभाग (कार्यासन व्यय १५) मंत्रालय, मुंबई
८. उपसचिव /कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प),पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई- (यांना उक्त अनुदानाची रक्कम अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीव्दारे उपलब्ध करुन देण्यासंदर्भातील कार्यवाहीसाठी अग्रेषित )
९. अवर सचिव (रोख शाखा),पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. दिग्दर्शक, अण्णाभाऊ साठे चित्रपट महोत्सव समिती व निर्मिती मिडीया, पुणे
११. निवडनस्ती (सां.का.१)